**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील विविध पदवी व पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांसाठी अभ्यांगत/तासिका तत्वावरील अध्यापकांना प्रदान करावयाच्या मानधनाचे दर सुधारित करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१८/(१८५/१८)/मशि-३,**

मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२.

दिनांक : १४ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा:** शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.टीईडी-२००८/(१८३)/०८/तांशि-५, दिनांक ०५ नोव्हेंबर,२००८

**प्रस्तावना :-**

उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारितील उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रमांसाठी सैद्धांतिक, प्रात्यक्षिके इत्यादी कामांकरीता संदर्भाधीन शासन निर्णयान्वये अभ्यांगत अध्यापकांचे मानधनाचे दर निश्चित करण्यात आले आहेत. संदर्भाधीन शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेले मानधनाचे दर सुधारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत सर्वांगीन विचार करुन खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारितील उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील अशासकीय अनुदानित महाविद्यालयांमध्ये विविध पदवी व पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांसाठी नियुक्त करण्यात येणाऱ्या अभ्यांगत / तासिका तत्वावरील अध्यापकांना प्रदान करावयाच्या मानधनाच्या दरात या शासन निर्णयाच्या दिनांकापासून पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अभ्यासक्रमाचा प्रकार | दिनांक ०५.११.२००८ च्या शासन निर्णयान्वये अनुज्ञेय असलेले दर (प्रति तासाकरीता) | | सुधारित दर (प्रति तासाकरीता) | |
|---|---|---|---|---|---|
| | | सैद्धांतिक | प्रात्यक्षिके | सैद्धांतिक | प्रात्यक्षिके |
| १. | कला, वाणिज्य, विज्ञान (पदवी) | रु. ३००/- | रु. १५०/- | रु.५००/- | रु.२००/- |
| २. | कला, वाणिज्य, विज्ञान (पदव्युत्तर) | रु. ३००/- | रु. १५०/- | रु.६००/- | रु.२५०/- |
| ३. | शिक्षणशास्त्र आणि शारीरिक शिक्षण (पदवी/ पदव्युत्तर व्यावसायिक अभ्यासक्रम) | रु. ३००/- | रु. १५०/- | रु.६००/- | रु.२५०/- |
| ४. | विधि (पदवी / पदव्युत्तर व्यावसायिक अभ्यासक्रम) | रु. ३००/- | रु. १५०/- | रु.६००/- | रु.२५०/- |

२. वरील सुधारीत दर पुढील अटींच्या अधिन राहून मंजूर करण्यात यावे. :-

१) तासिका तत्वावर अध्यापकांची नियुक्ती करण्यापूर्वी संस्थेतील संबंधित विद्याशाखेतील सर्व शिक्षकीय तसेच प्रशासकीय पदावर काम करणाऱ्या शिक्षकांना प्रमाणकानुसार शैक्षणिक भार देण्यात आला आहे याची खात्री करण्यात यावी.

२) तासिका तत्वावरील अध्यापकांची नियुक्ती करण्यापूर्वी विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण) यांचे कार्यालयाकडून संबंधित विषयाचा कार्यभार तपासून ना-हरकत प्रमाणपत्र घेणे आवश्यक राहील.

३) एका पूर्णवेळ रिक्त पदाकरिता फक्त दोनच तासिका तत्वावरील अध्यापकांच्या नेमणुका करता येतील. एका अध्यापकाकडे जास्तीत जास्त ०९ तासिकांचा कार्यभार सोपविता येईल.

४) संस्थेने विद्यापीठ मान्यतेने जाहिरात देऊन विद्यापीठ अनुदान आयोग/ शिखर संस्था/ शासन यांनी वेळोवेळी विहित केलेली शैक्षणिक अर्हता व पात्रताधारक अध्यापकांची स्थानिक निवड समितीमार्फत निवड करावी. ज्यामध्ये संस्थाप्रमुख, प्राचार्य, विभागप्रमुख व एक बाह्य विषय तज्ज्ञ असावा.

५) तासिका तत्वावरील अध्यापकांची एका शैक्षणिक वर्षासाठी जास्तीत जास्त ०९ महिन्यांसाठी तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात यावी व त्यास विद्यापीठाची मान्यता घेण्यात यावी. त्यानंतर ही नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

६) तासिका तत्वावरील नियुक्ती ही तात्पुरत्या स्वरुपातील नियुक्ती असल्याने त्यास नियमित सेवेचे कोणतेही हक्क प्राप्त होत नाहीत, त्यामुळे भविष्यात सेवेत कायम करण्याची मागणी/ नियमित सेवेच्या कोणत्याही हक्काची मागणी करणार नाही, तसेच त्यास एकावेळी एकाच महाविद्यालयात काम करता येईल, असे हमीपत्र रु. १००/- स्टॅम्प पेपरवर संबंधित अध्यापकाकडून रुजू होते वेळी घेण्यात यावे.

७) तासिका तत्वावरील कोणत्याही उमेदवारास एकाच महिन्यात त्याच्या दर्जाच्या अनुज्ञेय वेतनश्रेणीतील सुरुवातीच्या वेतनश्रेणीच्या रक्कमेपेक्षा जास्त मानधन दिले जाणार नाही याची जबाबदारी संबंधित महाविद्यालयाचे प्राचार्य/संस्थेचे संचालक तसेच सहसंचालक, उच्च शिक्षण यांची राहील.

८) तासिका तत्वावरील नियुक्त अध्यापकांना त्यांचे मानधन दरमहा नियमित स्वरुपात सेवार्थ/एचटीई सेवार्थ प्रणालीमार्फत अदा करण्यात यावे.

९) महाविद्यालयात कार्यरत पूर्णवेळ अध्यापकांना तासिका तत्वावरील दिलेली अतिरिक्त नियुक्ती मान्य केली जाणार नाही अथवा मानधन मिळण्यास पात्र होणार नाही.

१०) अभ्यांगत निमंत्रित हे संबंधित अभ्यासक्रमाशी निगडित व्यवसायातील तज्ज्ञ व्यक्ती पुरते मर्यादित राहतील. अशा अनुभव संपन्न व्यक्तीना व्याख्यानासाठी पाचारण करण्यात यावे, मात्र त्यांना अभ्यास पूर्ण करण्याच्या दृष्टीने निमंत्रित करण्यात येऊ नये.

११) प्रत्यक्ष उपलब्ध कार्यभार आणि तासिका तत्वावरील मानधन अदायगीबाबत काही अनियमितता आढळल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित महाविद्यालयाचे प्राचार्य/संस्थेचे संचालक तसेच सहसंचालक, उच्च शिक्षण यांची राहील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७०८/२०१८/व्यय-५, दि.०१.०९.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०१८१११४१२२९३९०५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Hemantkumar Pandharinath Baviskar

Digitally signed by Hemantkumar Pandharinath Baviskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=71de9bdf8c28541d92a5cd36d722315bab7f006ec5420633722d42e0976d82a8, serialNumber=284a4236ae7795d36dd2ecb5ac6ca70c333a3cf1b13f66828d224ae2026b37e9, cn=Hemantkumar Pandharinath Baviskar
Date: 2018.11.14 12:39:41 +05'30'

**(हे.पं.बाविस्कर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सहसंचालक, उच्च शिक्षण, सर्व विभागीय कार्यालये, महाराष्ट्र राज्य.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १-२, मुंबई / नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १-२, मुंबई / नागपूर.
५. वित्त विभाग, व्यय ५, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव/मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.
७. उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी.
८. निवड नस्ती, उच्च व तंत्र शिक्षण विभाग/मशि-३.